**बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर तसेच शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला येथे मनोविकृतीशास्त्र, बालरोगचिकित्साशास्त्र तसेच स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र या विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी एकूण ०९ अध्यापकीय पदांच्या निर्मितीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदनि - २१२१/प्र.क्र.३६/२०२१/वैसेवा -२**

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

तारीख: २८ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर व पुणे यांच्या सहकार्याने संचालनालयाच्या अधिनस्त बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे व इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथे मनोविकृतीशास्त्र या विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करणे तसेच सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत नागपूर व अकोला येथील रुग्णालयातील खाटांचा वापर करुन इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अकोला येथे बालरोगचिकित्साशास्त्र आणि स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत दिनांक ८ फेब्रुवारी, २०१९ अन्वये सामंजस्य करार करण्यात आला आहे. तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय दिनांक १६.०९.२०१९ नुसार केंद्र शासनाच्या सेंटर ऑफ एक्सलन्स या योजनेअंतर्गत मनोविकृती हा पदव्युत्तर अभ्यासक्रम संचालनालयाच्या अधिनस्त इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर आणि बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे येथे प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर व पुणे यांच्या सहकार्याने सुरु करण्यास मंजूरी प्रदान केली आहे. त्यानुसार बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे व इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर तसेच शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला येथे मनोविकृतीशास्त्र , बालरोगचिकित्साशास्त्र आणि स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करणे तसेच अस्तित्वात असलेल्या अभ्यासक्रमामध्ये पदव्युत्तर विद्यार्थीसंख्या वाढविण्यासाठी सद्याच्या उपलब्ध मनुष्यबळामध्ये अतिरिक्त अध्यापकीय पदे निर्माण करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर व पुणे यांच्या सहकार्याने संचालनालयाच्या अधिनस्त बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे व इंदिरा गांधी

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथे मनोविकृतीशास्त्र या विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करणे तसेच सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत नागपूर व अकोला येथील रुग्णालयातील खाटांचा वापर करुन इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर व शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अकोला येथे बालरोगचिकित्साशास्त्र आणि स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र विषयात पदव्युत्तर अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी खाली नमूद केल्याप्रमाणे एकूण ०९ अध्यापकीय पदे नव्याने निर्माण करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम/ वेतनश्रेणी | विषय | संबंधित संस्था | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | प्राध्यापक रु. १,४४,२००-२,१८,२००/- (लेवल-१४) | स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र | इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | ०१ |
| २ | सहयोगी प्राध्यापक रु.१,३१,४००-२,१७,१००/- (लेवल-१३ ए) | स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र | इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | ०१ |
| | | बालरोगचिकित्साशास्त्र | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला | ०१ |
| | | स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला | ०१ |
| ३ | सहायक प्राध्यापक रु. ५७,७००-१,८२,४००/- (लेवल-१०) | मनोविकृतीशास्त्र | बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे | ०१ |
| | | मनोविकृतीशास्त्र | इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | ०१ |
| | | स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र | इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | ०१ |
| | | बालरोगचिकित्साशास्त्र | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला | ०२ |
| | | | **एकूण** | **०९** |

२. बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर तसेच शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला येथील ०९ पदांच्या वेतनावर वार्षिक रु.१,७५,१०,६५२/- (रु. एक कोटी पंच्याहत्तर लाख दहा हजार सहाशे बावन्न फक्त) इतका वार्षिक खर्च करण्यास शासनाची मान्यता

देण्यात येत आहे. याबाबतचा खर्च संबंधित संस्थांनी सदर प्रयोजनार्थ त्यांना मंजूर असलेल्या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाने दि.१२.०१.२०२२ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०८०१/२०२१ (आ.पु.क.), दिनांक २५.१०.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२८१०४३५९९९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Sampatrao Patankar

Digitally signed by Shivaji Sampatrao Patankar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b99270d58a9b5eee189cedaf5d07b490751c0b9a3ad283cb0f2aa1c67e62fd0d, serialNumber=6b9623012ceb36169f87af4c1b6870fe8d2120e02fda1ff2c017fe617cdeda5c,
cn=Shivaji Sampatrao Patankar
Date: 2022.01.29 13:03:38 +05'30'

**शिवाजी पाटणकर**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
९. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
१०. अधिष्ठाता, बै.जी. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे / इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर / शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला
११. सर्व सहसचिव / उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुबई
१२. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/अकोला
१४. निवडनस्ती (वैसेवा-२).